CR- 393

**खरेदी भांडार करताना दोन लिफाफे पध्दतीमधील अत्यावश्यक कागदपत्रे सादर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
क्र. झेडपीए २००७/प्र.क्र. ३९३/वित्त-९
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १२ सप्टेंबर,२००७.

वाचा :- १) शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखस १०९४/(२६७९)/उद्योग-६,
दिनांक ३० मार्च, १९९४

**परिपत्रक**

खरेदी भांडार करताना दोन लिफाफे पध्दतीमधील अत्यावश्यक कागदपत्रे सादर करणेबाबत उद्योग , ऊर्जा व कामगार विभागने दिनांक ३० मार्च, १९९४ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सुचना दिलेल्या आहेत. या सूचनांमध्ये उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाने, क्रमांक भाखस २००१/(२९४९)/ उद्योग-६, दिनांक २५ जुन,२००२ अन्वये काही सुधारणा केलेल्या आहेत. हा शासन निर्णय सर्व जिल्हा परिषदांना लागू करण्यात येत आहे.

200908051419400।

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(अ.ग. रांदे)
लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
सर्व विभागीय आयुक्त (विकास शाखा)
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा कोकण भवन, नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा लेखा परिक्षक अधिकारी स्थानिक निधी लेखा
निवड नस्ती

A-14

खरेदी भांडार करताना दोन लिफाफे पध्दतीमधील अत्यावश्यक कागदपत्रे सादर करणेबाबत

महाराष्ट्र शासन
उद्योग ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र. भाखस २००१/(२९४९)/उद्योग-६
मंत्रालय, मुंबई ३२. दिनांक २५ जून, २००२

वाचा :- १) शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखस १०८८/(२५१२)/उद्योग-६, दिनांक २ जानेवारी, १९९२.
२) शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखस १०९४/(२६७९)/उद्योग-६, दिनांक ३० मार्च, १९९४.

प्रस्तावना :-

उद्योग. ऊर्जा व कामगार विभागाने भांडार खरेदी पध्दतीबाबत वर उल्लेखिलेल्या शासन निर्णयामधील दिनांक २.१.१९९२ मधील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ८.५ नुसार शासकीय खरेदीमध्ये दोन लिफाफे पध्दतीने निविदा मागविण्याची पध्दती अवलंबविण्यात आलेली आहे. दोन लिफाफे पध्दतीबाबत सविस्तर माहिती न दिल्याने विभागांना येत असलेल्या अडचणी लक्षात घेऊन शासनाने शासन निर्णय दि. ३० मार्च, १९९४ अन्वये दोन लिफाफे पध्दतीबाबत मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. या मार्गदर्शक सुचनांनुसार तांत्रिक लिफाफ्यामध्ये द्यावयाची जी अत्यावश्यक कागदपत्रे आहेत त्यामध्ये खालील प्रमाणपत्रांचा समावेश आहे.

१) निविदेच्या अंतिम तारखेपर्यंत ग्राहय असलेले आयकर भरल्यासंबंधीचे प्रमाणपत्र.
२) आधीच्या वर्षाच्या डिसेंबर अखेरपर्यंत विक्रीकराचा भरणा केलेला आहे असे संबंधित विक्रीकर अधिका-याचे प्रमाणपत्र अथवा विक्रीकर भरण्यापासून सूट मिळाली असल्यास तशा अर्थाचे सक्षम अधिका-याचे प्रमाणपत्र.

२. वरील अत्यावश्यक कागदपत्रांपैकी एक जरी दस्तऐवज तांत्रिक लिफाफ्यामध्ये उपलब्ध नसेल तर ती निविदा अग्राहय समजण्यात यावी. तसेच अशा निविदेचे व्यापारी लिफाफे उघडण्यात येऊ नयेत अशी तरतूद या शासन निर्णयात करण्यात आलेली आहे. याच शासन निर्णयात अशी देखील तरतूद करण्यात आलेली आहे की, निविदाकाराने सादर केलेल्या विक्रीकर/आयकर प्रमाणपत्रामध्ये काही किरकोळ त्रूटी असतील तरच व्यापारी लिफाफे उघडण्यापूर्वी जर त्रूटींची पूर्तता निविदाकाराने केली नाही तर ती निविदा अग्राहय समजावी व त्याचा व्यापारी लिफाफा उघडू नये.

३. सध्या प्रचलित असलेल्या वरील तरतूदीनुसार आयकर/विक्रीकर ही प्रमाणपत्रे निविदाकाराने तांत्रिक लिफाफ्यामध्ये दिली नाही तर ती निविदा अग्राहय असमजण्यात येते. सक्षम अधिका-याने आयकर किंवा विक्रीकर निपटारा प्रमाणपत्र देण्यास उशिर केला तर निविदाकार अशी प्रमाणपत्रे निविदेसोबत जोडू शकत नाही. परिणामी त्यांची निविदा अग्राहय ठरविण्यात येते. त्याचप्रमाणे निविदा नाकारल्यामुळे निवेदने प्राप्त होतात आणि काही वेळा निविदाकार न्यायालयात देखील जातात. तसेच संगणक आणि इतर निविदेमध्ये काही नामवंत उत्पादक कंपन्याच्याही निविदा वरील कारणास्तव अग्राहय ठरविल्या जात

असून शासनास स्पर्धात्मक दर आणि दर्जेदार माल मिळत नाही असा अनुभव आहे. ही परिस्थिती विचारात घेऊन विक्रीकर/आयकर निपटारा प्रमाणपत्र तांत्रिक लिफाफ्यामध्ये अत्यावश्यक दस्तऐवज म्हणून निविदाकाराला देणे आवश्यक आहे ही अट न वगळता त्याऐवजी निविदाकाराने विक्रीकर/आयकर नोंदणीबाबतचा क्रमांक सांक्षांकित करून तांत्रिक लिफाफ्यासमवेत द्यावा आणि विक्रीकर/आयकर निपटारा प्रमाणपत्र व्यापारी लिफाफे उघडण्यापूर्वी स्वतंत्ररित्या सादर करण्याची संधी देण्यात यावी असे आता निदर्शनास आले असल्यामुळे सध्याच्या दोन लिफाफे पद्धतीबाबतच्या दि. ३० मार्च १९९४ च्या शासन निर्णयामध्ये आवश्यक ती दुरुस्ती करणे आवश्यक आहे. या विषयावर श्री. सुधाकर जोशी, भूतपूर्व विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीमध्येही दि. ११/१०/२००१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये वरील प्रमाणे शिफारस करावी असे ठरविण्यात आले. सबब सदर शासन निर्णयामध्ये वरील परिस्थिती विचारात घेऊन पुढील प्रमाणे दुरुस्ती करण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

शासन निर्णय, शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखस १०९४/(२६७९)/उद्योग-६, दिनांक ३० मार्च, १९९४ मधील तांत्रिक निविदेच्या लिफाफ्याबाबतच्या परिच्छेदामधील परिच्छेद क्र. १.४.१.२ मधील (अ) आणि (ब) या तरतूदिनंतर पुढील तरतूद (क),(ड),(इ) आणि (फ) म्हणून समाविष्ट करण्यात येत आहे.

"(क) आयकर नोंदणीबाबतचा क्रमांक दर्शविणारे निविदाकाराने दिलेले सांक्षांकित प्रमाणपत्र.

(ड) विक्रीकर नोंदणीबाबतचा क्रमांक दर्शविणारे निविदाकाराने दिलेले सांक्षांकित प्रमाणपत्र.

(इ) आयकर आणि विक्रीकर निपटारा प्रमाणपत्र मिळण्यासाठी सक्षम अधिकाऱ्याकडे केलेल्या अर्जांच्या पोहोच पत्राची प्रमाणित छायाप्रत.

(फ) वरील दिनांक ३०/३/१९९४ च्या शासन निर्णयातील (अ) आणि (ब) येथे नमूद केलेली कागदपत्रे तांत्रिक लिफाफ्यासोबत निविदाकारास सादर करणे शक्य झाले नाही तर ती कागदपत्रे कोणत्याही परिस्थितीत व्यापारी लिफाफा उघडण्यापूर्वी स्वतंत्ररित्या सादर करणे निविदाकरावर बंधनकारक राहील अन्यथा त्यांची निविदा अग्राह्य ठरविण्यात यावी आणि त्याचा व्यापारी लिफाफा उघडण्यात येऊ नये."

२. शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखस १०९४/(२६७९)/उद्योग-६, दिनांक ३० मार्च, १९९४ मधील तांत्रिक निविदेच्या लिफाफ्याबाबतच्या अत्यावश्यक कागदपत्राबाबत परिच्छेद क्र. १.४.१.२ मध्ये वरील प्रमाणे दुरुस्ती केलेली असल्यामुळे सदर परिच्छेदाखालील टीप क्रमांक (२) रद्द करण्यात येत आहे.

३. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१०/२००२ /व्यय-१६, दि. ३०/५/२००२ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

(वि.कृ. साने)

कार्यासन अधिकारी.